**विभागीय आयुक्त, कोकण यांच्या अध्यक्षतेखाली चौकशी समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.विपता-२०२२/प्र.क्र.१५५/अ-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- २३ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या तीसरे (हिवाळी) अधिवेशनात श्री.अंबादास दानवे, विधानपरिषद सदस्य यांनी “बुलेट ट्रेनसाठी पालघर व ठाणे जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या संपादित करण्यात आलेल्या जमिनींचा मोबादला देण्याबाबत” या विषयाचा विधानपरिषद तारांकित प्रश्न क्र.१६२५२ हा दि.२७.१२.२०२२ रोजी विधानपरिषदेत प्राथम्य क्र.३ वर चर्चेस उपस्थित करण्यात आला होता. सदर तारांकीत प्रश्नावरील चर्चे दरम्यान प्रस्तुत प्रकरणी “समिती मार्फत चौकशी करुन त्याआधारे कार्यवाही करण्यात येईल” असे मा.मंत्री (महसूल) महोदयांनी सभागृहाला आश्वासित केले आहे. वरील वस्तुस्थितीच्या अनुषंगाने चौकशी समिती स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

“बुलेट ट्रेनसाठी पालघर व ठाणे जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या संपादित करण्यात आलेल्या जमिनींचा मोबादला देण्याबाबत” विभागीय आयुक्त, कोकण यांच्या अध्यक्षतेखाली या आदेशान्वये खालीलप्रमाणे तीन सदस्यीय चौकशी समिती गठित करण्यात येत आहे.

१) विभागीय आयुक्त, कोकण- अध्यक्ष

२) उपायुक्त (भूसंपादन), विभागीय आयुक्त कर्यालय, कोकण

३) समन्वय अधिकारी, भूसंपादन शाखा, ठाणे

**२. सदर चौकशी समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.**

१) पालघर व ठाणे जिल्ह्यातील बुलेट ट्रेन, मुंबई-अहमदाबाद द्रूत गती मार्ग, दिल्ली फ्रिट कॉरिडॉर (DFCCL) प्रकल्पाच्या भूसंपादनात अनियमितता अथवा गैरव्यवहार झाल्याबाबत प्राप्त विविध तक्रारी व दाखल गून्ह्यात सक्षम प्राधिकारी व अन्य महसूल अधिकारी यांचा सहभाग असल्याबाबत पडताळणी करणे.

२) वरील चौकशीत तथ्य आढळल्यास संबंधीतांविरुद्ध विभागीय चौकशी/फौजदारी गुन्हा संदर्भात प्रकरण परत्वे शासनास अहवाल देणे.

३) सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील तक्रारींच्या अनुषंगाने भूसंपादन प्रक्रियेत सखोल चौकशी करुन त्याबाबत अहवाल दि.२१.०३.२०२३ पर्यंत शासनास सादर करण्यात यावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र २०२३०२२४१२१४०१६५१९ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KEDARPRATAP JAYSING PATIL

Digitally signed by KEDARPRATAP JAYSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a304b555c16c6333932e94031b478a58b30bb35922ff7cfdc101bf31d56ff8d, pseudonym=B44BFB88097D80ECCD982D439D4A688B06CD57C, serialNumber=3847160374ED91C72AF7F541ED5885A54E39968A0CDDD47C85355D5B730A40BF, cn=KEDARPRATAP JAYSING PATIL
Date: 2023.02.24 12:17:47 +05'30'

**(केदारप्रताप पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रत-**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,राजभवन मलबार हिल,मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई
५) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) विभागीय आयुक्त, कोकण
८) निवड नस्ती (कार्यासन अ-२).

## परिशिष्ट-अ

| अ.क्र. | अर्जदार | विषय | दिनांक |
|---|---|---|---|
| १ | श्री. गणपत काळु गायकवाड, वि.स.स., १४२, कल्याण (पूर्व) यांचे पत्र | अंबरनाथ तालुक्यातील कुशिवली धरणासाठी संपादित केलेल्या जमिनीच्या मोबदल्यात झालेल्या गैरप्रकारांची विशेष तपास (एसआयटी) पथकामार्फत चौकशी करुन खऱ्या आरोपाला अटक करुन त्यांच्यावर कडक कारवाई करण्याबाबत. | १२.०७.२०२२ |
| २ | श्री.प्रसाद लाड, वि.प.स. | विधानपरिषद तारांकित प्रश्न क्र.१५१९८- कल्याण ग्रामीण विधानसभा मतदारसंघातून जाणाऱ्या बुलेट ट्रेन प्रकल्पात झालेल्या गैरव्यवहाराबाबत. | - |
| ३ | डॉ. (श्रीमती) मनिषा कायंदे, वि.प.स. | विधानपरिषद तारांकित प्रश्न क्र.१६३१०- अदिवासी मृत व्यक्तींच्या जमिनीच्या मोबदल्यासाठी भिवंडी (जि. ठाणे) येथील उपविभागीय कार्यालयामार्फत करण्यात आलेला गैरव्यवहार. | - |
| ४ | श्री. किशन कथोरे, वि.स.स. | विधानसभा तारांकित प्रश्न क्र.५०९२१- उल्हासनगर (जि.ठाणे) येथील प्रांत कार्यालयातंर्गत कुशिवली धरणासाठी भूसंपादनाच्या मोबदल्याबाबत. | - |
| ५ | श्री.विनोद निकोले, वि.स.स. | विधानसभा तारांकित प्रश्न क्र.५५४४४- राज्यात मुंबई वडोदरा महामार्गाची निर्मिती करताना पालघर जिल्ह्यातील ज्या आदिवासी शेतकऱ्यांच्या जमिनी महामार्गासाठी शासनाने संपादित केल्या त्यांना महामार्ग प्राधिकरणाकडून नुकसान भरपाई मिळाली नसल्याबाबत. | - |
| ६ | श्री.शांताराम मोरे, वि.स.स. | विधानसभा अतारांकित प्रश्न क्र.४०५४७- भिवंडी उपविभागात जिल्हा ठाणे शासनाच्या विविध प्रकल्पाकरीता संपादित केलेल्या जमिनीचा मोबदला मिळण्याबाबत. | - |
| ७ | श्री.विनोद निकोले, वि.स.स. | विधानसभा अतारांकित प्रश्न क्र.४२५३२- प्रकल्पबाधित आदिवासी शेतकऱ्यांना मोबदला देण्याबाबत. | - |
| ८ | - | "बुलेट ट्रेन ने घेतला भिवंडीतील प्रकल्पग्रस्त शेतकऱ्याचा बळी"- या दि.१५.०९.२०२२ रोजीच्या दैनिक सामनातील वृत्ताबाबत. (कै.उंदऱ्या दोडे यांच्या आत्महत्येबाबत) | १५.०९.२०२२ |
| ९ | श्री.विनोद निकोले, वि.स.स. | लक्षवेधी सूचना क्र.६९९ तातडीने मुंबई-बडोदा सुपर फास्ट हायवेच्या कामासाठी जमीन भूसंपादन झालेल्या शेतकऱ्यांना तातडीने मोबदला मिळणेबाबत. | - |

| | | | |
|---|---|---|---|
| १० | श्री.शांताराम मोरे, वि.स.स. | लक्षवेधी सूचना क्र. १३२४- भिवंडी तालुक्यातील प्रांत कार्यालयात होत असलेल्या भ्रष्टाचाराबाबत. | - |
| ११ | श्री.विनोद निकोले, वि.स.स. | लक्षवेधी सूचना क्र.६९८- तलासरी (जि.पालघर) तालुक्यातील सुत्रकार वेळूगाव राष्ट्रीय महामार्गाचा बांधकाम बाधित होणाऱ्या लोकांच्या नुकसानाची भरपाई मिळण्याबाबत. | - |
| १२ | श्री.संजय रायमुलकर, वि.स.स | लक्षवेधी सूचना क्र.८३६- भिवंडी तालुक्यातील भरोडी गाव येथील शेतकऱ्यांच्या जमिनी बुलेट ट्रेन प्रकल्पासाठी भूसंपादित करण्यात आल्या, त्यामध्ये बनावट शेतकऱ्यांना परस्पर पैसे वळवण्यात आलेले आहे. | - |
| १३ | श्री.शरद यशवंत पाटील | पालघरचे उपविभागीय अधिकारी श्री.धनाजी तोरसकर यांनी भूसंपादन करताना केलेल्या भ्रष्टाचाराची चौकशी करुन अन्यायग्रस्त शेतकऱ्यांना न्याय देणेबाबतचा अर्ज. | ६.०९.२०२१ |
| १४ | श्री.नरसिंह जनार्दन पाटील | श्री.धनाजी तोरसकर, भूसंपादन अधिकारी तथा उपविभागीय अधिकारी, पालघर यांनी विरार डहाणु रेल्वे चौपदरीकरण व बडोदा द्रुतगती मार्ग व भुयारी रेल्वे मार्गासाठी भूसंपादित जमिनीबाबत चुकीचे निर्णय दिल्याबाबत अर्ज. | ३०.०३.२०२२ |
| १५ | श्री.नरसिंह जनार्दन पाटील | दि.१८.०१.२०२१, ३.१२.२०२१, २८.१२.२०२१, ११.०४.२०२२, १६.०४.२०२२, ११.०५.२०२२, ६.०६.२०२२, २१.०६.२०२२, ६.०७.२०२२, ७.०७.२०२२, ७.०७.२०२२, १८.०९.२०२२ रोजीचे अर्ज | - |